**राज्य रोजगार हमी योजनेंतर्गत घेण्यात येणा-या जवाहर / धडक सिंचन विहीर योजनेतील इतर लाभार्थ्यांच्या अपूर्ण विहीरी पूर्ण करण्यास मुदतवाढ देण्याबाबत ..**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः योजना -२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५.**

१६ वा मजला, नविन प्रशासकीय भवन, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २९ जुलै, २०१५.

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः योजना -२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दिनांक २३ जानेवारी, २०१४.**
२) **शासन परिपत्रक क्रमांकः योजना-२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दिनांक २८ फेब्रुवारी, २०१४.**
३) **शासन पत्र क्रमांकः अखनि-२०१३/प्र.क्र.३०/ रोहयो-५ दिनांक १ एप्रिल २०१४.**
४) **शासन परिपत्रक क्रमांकः योजना -२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दिनांक १६ एप्रिल, २०१४.**
५) **शासन परिपत्रक क्रमांकः योजना -२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दिनांक २ जुलै, २०१४.**
६) **शासन निर्णय क्रमांकः योजना -२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दिनांक २२ डिसेंबर, २०१४.**

**प्रस्तावना -**

राज्य रोजगार हमी योजने अंतर्गत राज्यात जवाहर विहीर योजना तसेच विदर्भातील आत्महत्याग्रस्त ६ जिल्ह्यांमध्ये हीच योजना धडक सिंचन विहीर या नावाने अनुदान तत्वावर राबविण्यात येत आहे. या योजनेअंतर्गत सन २००७-०८ व २००८-०९ मध्ये ५१८०० जवाहर विहीरींचा व ८३२०० धडक सिंचन विहीरींचा लक्षांक ठरवून देण्यात आला होता. सदर योजनेचा आढावा घेण्यात येऊन जवाहर तसेच धडक सिंचन योजनेतील अपूर्ण असलेल्या विहीरींची माहिती सर्व जिल्हाधिका-यांकडून घेण्यात आली. त्यानुसार जानेवारी, २०१४ मध्ये इतर लाभार्थी प्रवर्गातील लाभार्थ्यांच्या २३०५ जवाहर विहीरी व १०६८६ धडक सिंचन विहीरी अपूर्ण असल्याचे दिसून आले. या अपूर्ण विहीरी पूर्ण करण्यासाठी देय असलेल्या अनुदानात वाढ करण्यात येऊन सदर अनुदान रू. २.५० लक्षच्या मर्यादेत करण्यात आले व या विहीरी दिनांक ३० जून, २०१४ पर्यन्त पूर्ण करण्याचा निर्णय दिनांक २३ जानेवारी, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला. त्यास दिनांक २ जुलै, २०१४ च्या शासन परिपत्रकान्वये दिनांक ३१ जुलै, २०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली.

सदर प्रकरणी डिसेंबर, २०१४ मध्ये जवाहर / धडक सिंचन विहीर योजनेचा फेरआढावा घेण्यात आला. त्यावेळी २२४० जवाहर विहीरी व ३७६९ धडक सिंचन विहीरी अपूर्ण असल्याचे सर्व जिल्हाधिका-यांकडील माहितीवरून दिसून आले. त्यामुळे या विहीरी पूर्ण करण्यासाठी संदर्भ क्रमांक ६ येथील दिनांक २२ डिसेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०.६.२०१५ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली. तद्नंतर अपूर्ण विहीरी तात्काळ पूर्ण करण्याबाबत शासनस्तरावरून वारंवार सूचना देण्यात आल्या. तसेच या विहीरी पूर्ण करण्यात येणा-या अडचणीं संदर्भात मार्गदर्शन करण्यात आले, या विहीरी पूर्ण करण्यासाठी व त्यांच्या प्रगतीबाबत शासनस्तरावर, विभागीय आयुक्त स्तरावर व जिल्हाधिकारी स्तरावर बैठकीच्या

तसेच व्हीडीयो कॉन्फरन्सच्या माध्यमातून शासनस्तरावरून प्रयत्न केले. त्यानुसार या विहीरी पूर्ण करण्याबाबत आवश्यक सूचना देखील देण्यात आल्या. अशाप्रकारे कार्यवाही करूनही जून, २०१५ अखेर ९१५ जवाहर विहीरी व १५८९ धडक सिंचन विहीरी अपूर्ण असल्याचे निदर्शनास आले आहे. आत्महत्याग्रस्त जिल्ह्यात सदर विहीरी तातडीने पूर्ण करणेबाबत शासन आग्रही आहे. सबब, अपूर्ण असलेल्या विहीरी तात्काळ पूर्ण करणे आवश्यक आहे, या बाबी विचारात घेता, रोहयोअंतर्गत जवाहर व धडक सिंचन विहीरी योजनेतील इतर लाभार्थ्यांच्या ९१५ जवाहर विहीरी व १५८९ धडक सिंचन विहीरी पूर्ण करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय-

**राज्य रोजगार हमी योजनेअंतर्गत घेण्यात येणा-या, जवाहर विहीर व धडक सिंचन विहीर योजनेतील अनुदानात वाढ करण्यात आलेल्या, इतर लाभार्थ्यांच्या दिनांक ३० जून, २०१५ अखेर अपूर्ण असलेल्या ९१५ जवाहर विहीरी व १५८९ धडक सिंचन विहीरी पूर्ण करण्यासाठी दिनांक ३० जून ,२०१६ पर्यन्त मुदतवाढ देण्यात येत आहे.**

सदर विहीरी पूर्ण करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी याबाबत कालबध्द कार्यक्रम ठरवावा व त्यानुसार वेळोवेळी आढावा घ्यावा.
२) सदर विहीरीबाबत जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विशेष प्रयत्न व नियोजन करावे.
३) सदर विहीरी पूर्ण करण्यासाठी आवश्यकतेनुसार संबंधिताना आवश्यक ते मार्गदर्शन करावे जेणे करुन या योजनेतील इतर लाभार्थ्यांच्या अपूर्ण असलेल्या विहीरी विहीत कालावधीत पूर्ण होऊ शकतील.
४) या विहीरी विहित कालावधीत पूर्ण न झाल्यास याबाबतची सर्व जबाबदारी जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.
५) सदर प्रकरणी लाभार्थ्यांना अनुदान देण्याची अंतिम तारीख **१५ जुलै, २०१६** अशी राहील.
६) दिनांक १५ जुलै, २०१६ नंतर शिल्लक असलेले अनुदान तात्काळ शासनास समर्पित करण्यात यावे.
७) या प्रकरणी शासनाच्या दिनांक १/४/२०१४ च्या पत्रासोबतचे मुख्य लेखा वित्त अधिकारी आणि कार्यकारी अभियंता (लघुसिंचन विभाग), जिल्हा परिषद, यांच्या संयुक्त स्वाक्षरीने द्यावयाचे प्रमाणपत्र दिनांक २० जुलै, २०१६ पर्यन्त शासनास सादर करावे.

८) सदर कालावधीत वरील प्रमाणपत्र प्राप्त न झाल्यास संबंधित मुख्य लेखा वित्त अधिकारी (CAFO) आणि कार्यकारी अभियंता (लघुसिंचन विभाग), जिल्हा परिषद, यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल.

९) सदर विहीरीसाठी यापुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१२३९०४५८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.07.31 16:42:23 +05'30'

**( आर. विमला )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो).
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५. सर्व कार्यकारी अभियंता, लघु सिंचन विभाग जिल्हा परीषद
६. मा. सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सहाय्यक संचालक (लेखा), रोहयो-७, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोहयो प्रभाग)
१०. निवडनस्ती, रोहयो-५.